**महात्मा गांधी यांची १५० वी जयंती**
**साजरी करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०१८/प्र.क्र.११६/एसडी-४

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २० ऑगस्ट, २०१८.

**<u>शासन परिपत्रक -</u>**

महात्मा गांधी यांच्या १५० व्या जयंती वर्षाचा शुभारंभ दिनांक ०२ ऑक्टोबर,२०१८ पासून होणार आहे. या शतकोत्तर सुवर्ण महोत्सवी वर्षामध्ये राज्यातील सर्व शाळांमधून दिनांक ०२ ऑक्टोबर,२०१८ पासून खालील कार्यक्रमांचे आयोजन करण्यात यावे :-

- दि.०२ ऑक्टोबर, २०१८ रोजी प्रभातफेरीचे आयोजन करावे. त्याचबरोबर गांधी वंदना, गांधीजींच्या छायाचित्रास पुष्पहार अर्पण करणे इ. कार्यक्रमांचे आयोजन करणे.

तद्नंतर पुढील वर्षभर दिनांक ०२ ऑक्टोबर,२०१९ पर्यन्त सोबतच्या आराखड्यात नमूद केल्याप्रमाणे खालील कार्यक्रमांचे आयोजन करावे:-

१) गांधीजींच्या असहकार चळवळ, सविनय कायदेभंग आंदोलन, भारत छोडो आंदोलन यावर निबंध स्पर्धा आयोजित करणे.
२) सर्व शाळांमधून विज्ञान जत्रांचे/प्रदर्शनांचे आयोजन करण्यात यावे. यात स्वच्छ भारत मिशन, जलसंधारण विषयक बाबी व सौर उर्जेच्या प्रसारावर भर देणाऱ्या प्रकल्पांचा समावेश करावा.
३) गांधीजींच्या विचारावर आधारित चित्रकला स्पर्धांचे आयोजन करावे.
४) गांधीजींचे स्वातंत्र्य चळवळीतील योगदान या विषयावर प्रश्नमंजुषा स्पर्धा आयोजित करणे.
५) या शतकोत्तर सुवर्ण महोत्सवी जयंती वर्षाच्या कालावधीत गांधीवादी विचारवंतांचे व्याख्यान विद्यार्थ्यांसाठी आयोजित करावे.

आराखड्यात नमूद केलेले कार्यक्रम उदाहरणादाखल देण्यात आलेले आहेत या व्यतिरिक्त देखील महात्मा गांधींचे विचार विद्यार्थी,पालक व जनमानसांत पोचतील या उद्देशाने विविध अभिनव कार्यक्रमांचे आयोजन शाळा स्तरावर करण्यात यावे.

वर नमूद केल्याप्रमाणे कार्यक्रमांचे आयोजन सर्व व्यवस्थापनांच्या शाळांमधून करण्यात यावे. आयोजित करण्यात आलेल्या कार्यक्रमाचा अहवाल संबंधित शिक्षणाधिकारी यांच्याकडे सादर करण्यात यावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८०८२०१६५८३४५३२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Saraf

Digitally signed by Milind Saraf
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0d8450ee89cd863fe6ee37a1ae9a08856aba16105c18d8f6e7e5d173cd0667f3, cn=Milind Saraf
Date: 2018.08.20 17:06:59 +05'30'

**( मिलिंद सराफ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
३) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्या प्राधिकरण), पुणे
६) संचालक, अल्पसंख्याक व प्रौढ शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७) संचालक, महाराष्ट्र राज्य पाठयपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ (बालभारती), पुणे
८) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे
९) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे
१०) विभागीय अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ (सर्व)
११) विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व)
१२) आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
१३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१४) सर्व शिक्षण अधिकारी (प्राथमिक/माध्यमिक), जिल्हा परिषद, शिक्षण निरीक्षक, मुंबई (उत्तर/दक्षिण/पश्चिम) प्रशासन अधिकारी, महानगरपालिका/नगरपालिका/कटक मंडळे
१५) गटशिक्षणाधिकारी, पंचायत समिती (सर्व)
१६) निवड नस्ती (एस.डी.४).

<u>प्रपत्र – अ</u>

<u>महात्मा गांधी यांची १५० वी जयंती साजरी करणेबाबत आराखडा</u>

| अ. क्र. | दिनांक (कालावधी) | विषय | कार्यक्रम राबविण्याविषयी यंत्रणा | कार्यक्रम राबविण्यात येणारे क्षेत्र |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १) | दि. २ ऑक्टोबर, २०१८ | सर्व शाळांमधून प्रभात फेरीचे आयोजन/गांधी वंदना व गांधीजींच्या छायाचित्रास पुष्पहार अर्पण करणे इ. | (१) शिक्षण संचालक (माध्यमिक), पुणे (२)शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे | राज्यातील सर्व शाळा |
| २) | दि.१ नोव्हेंबर ते दि.३० नोव्हेंबर, २०१८ (सुट्टी कालावधी वगळता) | गांधीजींच्या असहकार चळवळ, सविनय कायदेभंग आंदोलन, भारत छोडो आंदोलन यावर निबंध स्पर्धा आयोजित करणे इ. | (१) शिक्षण संचालक (माध्यमिक), पुणे (२)शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे | विभागनिहाय कार्यक्रम राबविण्यात येईल. |
| ३) | दि.१ डिसेंबर ते दि.३१ डिसेंबर, २०१८ | सर्व शाळांमधून विज्ञान जत्रांचे/प्रदर्शनाचे आयोजन यात स्वच्छ भारत मिशन,जलसंधारण विषयक चर्चा व सौर उर्जेच्या प्रसारावर भर देणाऱ्या बाबी प्रकल्पाचा समावेश इ. | (१) शिक्षण संचालक (माध्यमिक), पुणे (२)शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे | विभागनिहाय कार्यक्रम राबविण्यात येईल. |
| ४) | दि. १ जानेवारी, २०१९ ते दि. ३१ जानेवारी, २०१९ | गांधीजींच्या विचारावर आधारित चित्रकला स्पर्धांचे आयोजन इ. | (१) शिक्षण संचालक (माध्यमिक), पुणे (२) शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे | विभागनिहाय कार्यक्रम राबविण्यात येईल. |
| ५) | दि. १ फेब्रुवारी, २०१९ ते दि.२८ फेब्रुवारी, २०१९ | गांधीजींचे स्वातंत्र्य चळवळीतील योगदान या विषयावर प्रश्नमंजूषा स्पर्धेचे आयोजन इ. | (१) शिक्षण संचालक माध्यमिक),पुणे (२) शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे | विभागनिहाय कार्यक्रम राबविण्यात येईल. |
| ६) | दि. १ मार्च, २०१९ ते दि. ३० एप्रिल, २०१९ | शाळांच्या वार्षिक परीक्षा कालावधी | निरंक | निरंक |
| ७) | दि. १ मे, २०१९ ते दि. १५ जून, २०१९ | उन्हाळी सुट्टी कालावधी | निरंक | निरंक |
| ८) | दि.१६ जून, २०१९ ते दि. ३० जून, २०१९ | शतकोत्तर सुवर्ण महोत्सवी जयंती वर्षाच्या कालावधीत गांधीवादी विचारवंताचे व्याख्यान इ. | (१) शिक्षण संचालक (माध्यमिक), पुणे (२) शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे | मुंबई विभाग पुणे विभाग |
| ९) | दि. १ जुलै, २०१९ ते दि. ३१ जुलै, २०१९ | शतकोत्तर सुवर्ण महोत्सवी जयंती वर्षाच्या कालावधीत गांधीवादी विचारवंताचे व्याख्यान इ. | (१) शिक्षण संचालक (माध्यमिक),पुणे (२) शिक्षण संचालक (प्राथमिक),पुणे | औरंगाबाद विभाग नाशिक विभाग |
| १०) | दि. १ ऑगस्ट, २०१९ ते दि.३१ ऑगस्ट,२०१९ | शतकोत्तर सुवर्ण महोत्सवी जयंती वर्षाच्या कालावधीत गांधीवादी विचारवंताचे व्याख्यान इ. | (१) शिक्षण संचालक (माध्यमिक), पुणे (२) शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे | लातूर विभाग कोल्हापूर विभाग |
| ११) | दि.१ सप्टेंबर, २०१९ ते दि.३० सप्टेंबर, २०१९ | शतकोत्तर सुवर्ण महोत्सवी जयंती वर्षाच्या कालावधीत गांधीवादी विचारवंताचे व्याख्यान इ. | (१) शिक्षण संचालक (माध्यमिक),पुणे (२) शिक्षण संचालक (प्राथमिक),पुणे | नागपूर विभाग अमरावती विभाग |
| १२) | दि. २ ऑक्टोंबर, २०१९ | महात्मा गांधीजी यांच्या शतकोत्तर सुवर्ण महोत्सवी जयंती वर्षाचा समारोप. | (१) शिक्षण संचालक (माध्यमिक), पुणे (२) शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे | सर्व शाळा |

XXXXXX